**सहकारी सूतगिरण्यांनी वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जावरील व्याजाचे प्रदान करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-१७१७/ प्र.क्र.१३/ टेक्स-१ (ब)

मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ जुलै, २०१७

**वाचा :-**

सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. धोरण-१०१६/प्र.क्र.९६/टेक्स-१(ब), दिनांक ११ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यात वस्त्रोद्योग व्यवसायातील कापसाचे वाढते भाव, सुताच्या बाजारातील घसरलेल्या किंमती इत्यादीमुळे वस्त्रोद्योग व्यवसाय अडचणीत आला आहे. त्याअनुषंगाने सहकारी सूतगिरण्यांच्या अडीअडचणी सोडविण्यासाठी दिनाक ९ जानेवारी, २०१७ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला -- सहकारी सूतगिरण्या सुरळीत चालाव्यात तसेच आर्थिक अडचणीतून बाहेर याव्यात याकरीता राज्यातील सहकारी सूतगिरण्यांनी प्रति चाती रुपये ३,०००/- याप्रमाणे वित्तीय संस्थेकडून / राष्ट्रीय सहकारी विकासमहामंडळाकडून त्यांच्या स्तरावर ५ वर्षे मुदतीसाठी कर्ज घ्यावे. सदर ५ वर्षांचे कमाल १२ % पर्यंतचे व्याज शासन भरेल. परंतू ज्या सहकारी सूतगिरण्यांनी त्यांना यापूर्वी, शासन आदेश दिनाक ३ डिसेंबर, २०११ अन्वये प्राप्त झालेल्या बिनव्याजीकर्जाची परतफेड केली आहे त्याच सूतगिरण्या या योजनेसाठी पात्र राहतील. यासाठी येणाऱ्या खर्चासाठी विहित पद्धतीने स्वतंत्रपणे तरतूद करण्यात येईल. सदर निर्णयाच्या अनुषंगाने विभागाच्या दिनाक ११ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयान्वये आदेशही निर्गमित करण्यात आले आहेत. राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून घेण्यात येणाऱ्या कर्जावरील व्याजाचे प्रदान करण्यासाठी विभागाकडे स्वतंत्र लेखाशीर्ष उपलब्ध आहे. तथापि, इतर वित्तीय संस्थांकडून घेतलेल्या कर्जावरील व्याजाचे प्रदान करण्यासाठी लेखाशीर्ष उपलब्ध नव्हते. त्यामुळे दिनांक ११.१.२०१७ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने सहकारी सूतगिरण्यांनी वित्तीय संस्थेकडून प्रति चाती रुपये ३,०००/- याप्रमाणे घेतलेल्या कर्जावरील ५ वर्षांच्या कमाल १२ % पर्यंतच्या व्याजाची रक्कम संबंधित वित्तीय संस्थांना अदा करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहकारी सूतगिरण्यांनी वित्तीय संस्थेकडून प्रति चाती रुपये ३,०००/- याप्रमाणे घेतलेल्या कर्जावरील ५ वर्षांच्या कमाल १२ % पर्यंतच्या व्याजाची रक्कम संबंधित वित्तीय संस्थांना अदा करण्यासाठी पुढीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक व्ही- १

२०४९ - व्याज प्रदाने

०१- देशांतर्गत ऋणावरील व्याज

२००-देशांतर्गत इतर ऋणांवरील व्याज

(०२), इतर संस्थांकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज

(०२) (०६) वित्तीय संस्थांकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज

(२०४९ २५५१)

हा शासन निर्णय, महालेखापाल, मुंबई यांच्या क्र. ख.वि/चा-१/सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग/ यूओआर-१७५/२०१६-१७/७८, दिनांक २०.४.२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२१८/अर्थ-१३, दिनांक ५.६.२०१७ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०५१७३८५०५२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod D. Tupe

Digitally signed by Pramod D. Tupe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28590802f030b209e5b1d488527383f61acb2a10c00b8e9718dcbbc845a30f9b, cn=Pramod D. Tupe
Date: 2017.07.05 17:38:58 +05'30'

**(प्रमोद द. तुपे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
२) महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई .
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
५) प्रधान सचिव ( वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी , रोखशाखा,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७) अवर सचिव , कार्यासन १७-स / कक्ष अधिकारी, १६-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) वित्त विभाग ( कार्यासन व्यय-२/ अर्थ-१३ ), मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
१२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई ४०० ००१.
१३) निवडनस्ती (टेक्स-१ (अ)/ टेक्स-१ (ब)).